**एक पडदा चित्रपटगृहांना करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय करण्याबाबत सुधारित नियम निश्चित करणे व मान्यतेकरिता कालमर्यादा वाढविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१२/प्र.क्र.३३/टी-१**
३२ वा मजला, सेन्टर वन इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई - ४०० ००५
तारीख: ४ सप्टेंबर, २०१४

<u>वाचा</u>

**१. शासन निर्णय क्र. ईएनटी२०१३/प्र.क्र.३३/टी-१, दिनांक: २८ फेब्रुवारी, २०१३**
**२. शासन निर्णय क्र. ईएनटी२०१३/प्र.क्र.३३/टी-१, दिनांक: ३ मे, २०१४**
**३. प्रशासकीय आदेश क्र. ईएनटी२०१३/प्र.क्र.११०/टी-१, दिनांक: २७ मार्च, २०१४**

<u>प्रस्तावना</u>

राज्यातील चित्रपट उद्योगास उर्जितावस्था प्राप्त होण्याकरिता तसेच उच्च दर्जाच्या प्रक्षेपण प्रणालीचा चित्रपटगृहचालकांनी उपयोग करावा याकरिता राज्य शासनाने ग्रामपंचायत क्षेत्रातील एक पडदा चित्रपटगृहांना ७ वर्षासाठी आणि 'अ' 'ब' वर्ग नगरपरिषदेच्या क्षेत्रासाठी एक पडदा चित्रपटगृहांना ५ वर्षासाठी अत्याधुनिकीकरण व डिजीटल तंत्रज्ञान अंतर्भूत करण्याकरिता महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ३ मध्ये सुधारणा करुन एक पडदा चित्रपटगृहांना संपूर्ण करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय करण्यात आली आहे. या अनुषंगाने संनियंत्रणाकरिता संदर्भ क्र. १ मध्ये नमूद शासन निर्णय दि. २८ फेब्रुवारी, २०१३ द्वारे नियमावली/ प्रशासकीय कार्यपध्दती निश्चित करण्यात आली.

एकपडदा चित्रपटगृहास करमणूक शुल्क माफी देण्याच्या प्रक्रियेकरिता सूचना देणेबाबत, अंतिम निर्णय घेण्याकरिता कालमर्यादा वाढविणेबाबत तसेच २ के डीसीआय यंत्रणा अथवा उपग्रह आधारीत नॉन डीसीआय प्रक्षेपण यंत्रणा बसविणेबाबत चित्रपटगृहांना अतिरिक्त सेवाशुल्क आकारण्यास दिलेली मान्यता रद्द केल्याने करमणूक शुल्क माफी देणेकरिता निश्चित

नियमावलीतील सदर प्रक्षेपण यंत्रणा बसविणेबाबतची अट शिथिल करण्याची बाब राज्यशासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

**अ)** एकपडदा चित्रपटगृहांना करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय करण्याकरिता अर्ज करणेबाबत संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ मध्ये नमूद कालमर्यादेमध्ये वाढ न करता केवळ ज्या एकपडदा चित्रपटगृहांनी विहित मुदतीत अर्ज केले आहेत, **त्यांचे अर्ज निकाली काढण्याकरिता दि. ३१ डिसेंबर, २०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

**ब)** राज्यशासनाने एकपडदा चित्रपटगृहांना करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय होणेकरिता निश्चित केलेल्या अनिवार्य सुविधा तसेच अत्याधुनिकरणाकरिता चित्रपटगृह बंद ठेवण्याची आवश्यकता नसल्याने असे स्पष्ट करण्यात येते की, **विभागीय आयुक्त कार्यालयाकडून या शासन निर्णयापूर्वी दिलेले अथवा भविष्यात देण्यात येणारे सशर्त हेतूपत्र जारी झाल्यानंतर तसेच चित्रपटगृह व्यवस्थापनाने अनुज्ञेय अनामत रकमेचा भरणा केल्यानंतर चित्रपटगृहाचा करमणूक शुल्क सवलतीचा कालावधी सुरु होईल.** सशर्त हेतूपत्र निर्गमित केल्यानंतर चित्रपटगृह व्यवस्थापनाने संदर्भाधीन शासन निर्णयांद्वारे निश्चित सर्व अटींचे पालन करुन एक वर्षाच्या कालावधीमध्ये अनिवार्य सुविधा तसेच अत्याधुनिकरण पूर्ण करुन ते जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्रमाणित करणे आवश्यक राहील.

**क)** राज्यशासनाने संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये २ के डीसीआय यंत्रणा अथवा उपग्रह आधारीत नॉन डीसीआय यंत्रणा यासारख्या महागड्या अत्याधुनिक प्रक्षेपण यंत्रणा बसवणेकरिता प्रोत्साहनात्मक तरतुद म्हणून अनुज्ञेय सेवाशुल्क रद्द केला आहे. यामुळे करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय केलेल्या एकपडदा चित्रपटगृहांना या प्रक्षेपण यंत्रणा बसवणे आर्थिकदृष्ट्या सुसह्य होणार नसल्याने संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ मधील मुद्दा क्र. १६ अन्वये २ के डीसीआय यंत्रणा अथवा उपग्रह आधारीत नॉन डीसीआय प्रक्षेपण यंत्रणा उपलब्ध करुन देणेबाबत निश्चित नियम शिथिल करुन **सदर सेवा ऐच्छिक करण्यात येत आहे**. तथापि, भविष्यकाळात तंत्रज्ञानातील बदलामुळे डिजीटल प्रक्षेपण प्रणालीचा वापर अपरिहार्य असणार आहे. यामुळे चित्रपटगृहामध्ये

उपरोक्त नमूद प्रक्षेपण प्रणालीपैकी आर्थिक क्षमतेनुसार कोणतीही एक प्रक्षेपण यंत्रणा चित्रपटगृहामध्ये उपलब्ध करुन देण्याकरिता व्यवस्थापनाने प्रयत्न करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१३५६३०५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.09.05 11:27:18 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) अध्यक्ष, ग्रामीण महाराष्ट्र थिएटर संघटना

**प्रत माहितीसाठी**

१) मा.मंत्री (महसूल ) यांचे खाजगी सचिव, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, ३२ वा मजला, सेंटर १, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड,कुलाबा, मुंबई ४०० ००५
३) प्रधान सचिव (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक
४) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक
५) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
६) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
७) निवड नस्ती, टी-१ कार्यासन